**अर्धापूर जि. नांदेड या तालुक्याच्या ठिकाणी**
**उप कोषागार कार्यालय कार्यान्वित करणेबाबत.**

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण २००९/प्र. क्र. ३४ / कोषा प्र- ५
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ६ ऑगस्ट २००९

**शासन निर्णय:-**

शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. आरइएन-४२९९ / प्र. क्र. ११६ / म-१०, दि. ११/०१/२००० मध्ये नमुद केल्याप्रमाणे अर्धापूर तालुका, जिल्हा नांदेड दि. ३०/१२/१९९९ पासून कार्यान्वित करण्यात आला आहे. महाराष्ट्र कोषागार नियम १९६८ भाग - एक मधील नियम ५ नुसार प्रत्येक तालुक्याच्या ठिकाणी उप कोषागार कार्यालय कार्यान्वित करणे आवश्यक आहे. यास अनुलक्षून शासन याद्वारे अर्धापूर, जि. नांदेड येथे उप कोषागार कार्यालय कार्यान्वित करण्यास मंजूरी देत आहे.

२. नांदेड जिल्हा कोषागार कार्यालयांच्या अधिपत्याखाली अर्धापूर उप कोषागार कार्यालय कार्यरत राहील व त्यांचे दैनिक लेखे अर्धापूर उप कोषागार अधिकारी, नांदेड जिल्हा कोषागार अधिकारी यांना नियमितपणे सादर करतील.

३. अर्धापूर उप कोषागार कार्यालयांसाठी आवश्यक असलेला कर्मचारी वर्ग व इतर अनुषंगीक बाबींस मान्यता देण्याचे आदेश स्वतंत्ररित्या निर्गमित करण्यात येत आहेत. त्याबाबत संचालक लेखा व कोषागारे यांनी आवश्यक कार्यवाही तातडीने करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून याचा संगणक संकेतांक २००९०८०६१६३०५४००१ असा आहे.

महाराष्ट्र राज्याचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(सु. सं. धपाटे)
अवर सचिव

प्रति,
राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे व उप मुख्यमंत्र्यांचे स्वीय सहाय्यक,
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर,
प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.

- सचिव, महसुल व वन विभाग, मुंबई,
- प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,
- प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
- प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई
- सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
- प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,

[कृ.मा.प.

विभागीय आयुक्त, औरंगाबाद.
जिल्हाधिकारी, नांदेड
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
उपसंचालक, ले. व को. पुणे/नाशिक/नागपूर/अमरावती/औरंगाबाद/कोकण विभाग,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / वांद्रे,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
सर्व उपकोषागार अधिकारी,
सर्व मंत्रालयीन विभाग,
मुख्य लेखा अधिकारी, भारतीय रिझर्व बँक, बँक व सरकारी लेखा विभाग, सी - ७, बांद्रे - कुर्ला संकुल, पो. बॉक्स क्र. ८१४३, बांद्रे (पूर्व), मुंबई - ४०० ०५१,
व्यवस्थापक, भारतीय रिझर्व बँक, लोकलेखा विभाग, नागपूर,
कक्ष अधिकारी, कोषा (प्र-१), कोषा (प्र-२), कोषा (प्र-३), कोषा (प्र-४),प्रशासन - १ व नोंदणी विभाग, ग्रंथालय, वित्त विभाग
निवड नस्ती, कोषा प्रशा-५ कार्यासन, वित्त विभाग.

- पोष्टाने

.......

H-1362-125